महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायती
यामध्ये उर्जा बचतीचे प्रकल्प राबविण्यासाठी
राज्यस्तरीय समिती गठित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१८३/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक ११ जुलै, २०१७

संदर्भ :-

१. शासन निर्णय,उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्रमांक अपाऊ-२०१५/ प्र.क्र.३७८/ उर्जा-७, दिनांक २२ जून, २०१७
२. मुख्य सचिव कार्यालयाची टिप्पणी क्रमांक मुसका-२०१७/२३४७९६१/का.१, दिनांक ०६ जून, २०१७

**प्रस्तावना:-**

नगर विकास विभागाने एनर्जी एफिशिएन्सी सर्व्हिसेस लिमिटेड (EESL) च्या माध्यमातून महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायतीमध्ये उर्जा संवर्धन धोरण राबवावे अशा सूचना उपरोक्त संदर्भ क्र.२ अन्वये देण्यात आल्या आहेत. तसेच, उद्योग उर्जा व कामगार विभागाने त्यांच्या संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयाच्या परिच्छेद ३.१ अन्वये महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती पथदिवे व पाणी पुरवठा योजनांमध्ये उर्जा बचतीचे प्रकल्प ESCO तत्वावर राबविण्यासाठी नगर विकास विभागाने राज्य स्तरीय समितीची स्थापना करावी व या समितीत महाउर्जाच्या प्रतिनिधींचा समावेश करावा, अशा सूचना दिल्या आहेत. त्यानुसार राज्य स्तरीय समिती गठित करण्याची बाब विचाराधीन होती

**शासन निर्णय**

महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायती यामधील पथदिवे व पाणी पुरवठा योजनांमध्ये एनर्जी एफिशिएन्सी सर्व्हिसेस लिमिटेड (EESL) च्या माध्यमातून उर्जा बचतीचे प्रकल्प ESCO तत्वावर राबविण्यासाठी उपरोक्त अ.क्र. १ येथील शासन निर्णयातील तरतुदींस अनुसरून खालीलप्रमाणे राज्य स्तरीय समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (उर्जा) उद्योग उर्जा व कामगार विभाग (किंवा त्यांचे किमान उप सचिव दर्जाचे प्रतिनिधी) | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (किंवा त्यांचे किमान उप सचिव दर्जाचे प्रतिनिधी) | सदस्य |
| ४ | महासंचालक, मेडा, पुणे | सदस्य |
| ५ | आयुक्त तथा संचालक नगर परिषद प्रशासन संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ६ | व्यवस्थापक (उर्जा संवर्धन), मेडा, पुणे | सदस्य |
| ७ | सह सचिव, नगर विकास विभाग | सदस्य सचिव |

२. सदर समिती महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती यामधील पथदिवे व पाणी पुरवठा योजनांमध्ये एनर्जी एफिशिएन्सी सर्व्हिसेस लिमिटेड (EESL) च्या माध्यमातून उर्जा बचतीचे प्रकल्प ESCO तत्वावर राबविण्याबाबत करारनाम्याचे प्रारूप, अटी व शर्ती ठरविणे व तदनुषंगिक विविध निर्णय घेण्यासाठी शासनास शिफारशी करील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असूनत्याचा संकेतांक २०१७०७१११४१०१६५५२५ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.07.11 17:35:42 +05'30'

**(पां.जो.जाधव)**

**सह सचिव, नगर विकास विभाग**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
४. अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
५. प्रधान सचिव,नगरविकास विभाग(२) यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव (उर्जा), उद्योग उर्जा व कामगार विभाग,
७. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग
८. महासंचालक, मेडा, पुणे
९. आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
१०.महाव्यवस्थापक (उर्जा संवर्धन), मेडा, पुणे
११.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई
१२.महानगरपालिका आयुक्त, सर्व महानगरपालिका
१३.मुख्याधिकारी, सर्वनगरपरिषदा
१४.मुख्याधिकारी, सर्व नगरपंचायती
१५.निवडनस्ती, नवि-२०.

*****